श्री. विजयकुमार गौतम, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांच्या विशेष कार्य अधिकारी, जलसंपदा विभाग या कंत्राटी तत्वावरील नियुक्तीस मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एलटीएस २१/प्र.क्र.१२५ (भाग-१) /२०२१/आ (वर्ग-१),**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ११ मे, २०२२.

संदर्भ :-

१. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्रमांकः एलटीएस २१/प्र.क्र.१२५/२०२१/आ (वर्ग-१), दि.०७.०५.२०२१
२. जलसंपदा विभाग, कार्यालयीन आदेश, क्रमांक: संकीर्ण १४२१/प्र.क्र.२००/२०२१/आ (वर्ग-१), दि. १३.०१.२०२२

प्रस्तावना:-

जलसंपदा विभागांतर्गत राबविण्यात येत असलेले महत्वाचे प्रकल्प व योजना मार्गी लावण्याच्या दृष्टीने श्री. विजयकुमार गौतम, भा.प्र.से. (सेवानिवृत्त) यांच्या अनुभवाचा विभागास फायदा होण्याच्या अनुषंगाने संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये त्यांची दि.०७.०५.२०२१ ते दि. ०६.०५.२०२२ या १ वर्षाच्या कालावधीकरिता विशेष कार्य अधिकारी, जलसंपदा विभाग म्हणून कंत्राटी तत्वावर नियुक्ती करण्यात आली होती. श्री. गौतम यांचा कंत्राटी तत्वावरील नियुक्तीचा कालावधी दि.०६.०५.२०२२ रोजी संपुष्टात आला आहे. विभागांतर्गत प्रकल्प व योजनांसंबंधित अपूर्ण कामे पुर्णत्वास नेण्याच्या दृष्टीने श्री. विजयकुमार गौतम, भा.प्र. से. (सेवानिवृत्त) यांच्या विशेष कार्य अधिकारी, जलसंपदा विभाग या कंत्राटी तत्वावरील नियुक्तीस १ वर्षाची मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:**

श्री. विजयकुमार गौतम, भा.प्र. से. (सेवानिवृत्त) यांची संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये दि.०७.०५.२०२१ ते दि. ०६.०५.२०२२ या १ वर्षाच्या कालावधीकरिता विशेष कार्य अधिकारी, जलसंपदा विभाग म्हणून कंत्राटी तत्वावर नियुक्ती करण्यात आली असून सदर नियुक्तीचा कालावधी दि.०६.०५.२०२२ रोजी संपुष्टात आला आहे. आता श्री. विजयकुमार गौतम, भा.प्र. से. (सेवानिवृत्त) यांच्या विशेष कार्य अधिकारी, जलसंपदा विभाग म्हणून कंत्राटी तत्वावरील नियुक्तीस दि.०७.०५.२०२२ पासून १ वर्षाच्या कालावधीकरिता मुदतवाढ देण्यात येत आहे.

**२.** श्री. विजयकुमार गौतम, भा.प्र. से. (सेवानिवृत्त) यांच्या सदर मुदतवाढीच्या कालावधीकरिता कंत्राटी तत्वावरील नियुक्ती संदर्भात यापुर्वी संदर्भ क्र.१ व २ अन्वये निश्चित केलेल्या अटी व शर्ती कायम राहतील.

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक क्र. २०२२०५०६१५००४४६३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS VINAYAKRAO
BILONIKAR

Digitally signed by KAILAS VINAYAKRAO BILONIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9a27dfb4b6256843f8c1809ab4420a59790d825d1fe9528b0173f1603963ddb7, pseudonym=BCF91AD2CBD5640CFA1DAB00655BEAE83A361F00, serialNumber=05EE2306C341BA74D47D58063086FC4D71937218B757CE53F4397E7F31F05BFE, cn=KAILAS VINAYAKRAO BILONIKAR
Date: 2022.05.13 12:08:04 +05'30'

**( कैलास बिलोणीकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

श्री. विजयकुमार गौतम, भा.प्र. से. (सेवानिवृत्त)

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई .
३. मा. मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव (लाक्षेवि/ प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अवर सचिव (रवका / गृव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन आ(वर्ग-१) संग्रहार्थ.